मा. मुख्यमंत्री, विशेषकृती कार्यक्रम २०१३-१४ अंतर्गत यवतमाळ जिल्हयातील पुरबाधित १७ गावात पूरसंरक्षक कामे.मौजे फेट्री ता. दिग्रस जि. यवतमाळ येथे नाला सरळीकरणाचे काम करणेबाबतच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

### शासन निर्णय क्रमांकः पुसंभि-२०१४/(प्र.क्र.२९१/२०१४)/सिंव्य.(महसूल)

मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक: २१ जुलै, २०१४

**वाचा :-**

1) मुख्य अभियंता जलसंपदा विभाग, अमरावती यांचे पत्र क्र. २७९१/लपाकक्ष/ पु.सं.भि./२०१४ दिनांक १९/६/२०१४

**प्रस्तावना:-**

यवतमाळ जिल्हयात सन २०१३ च्या पावसाळयात अतिवृष्टी झाल्यानंतर मा.मुख्यमंत्री यांचा दौरा झाला. त्या दौऱ्या दरम्यान यवतमाळ जिल्हयातील अतिबाधीत १७ गावातील पूरसंरक्षक कामे हाती घेण्याच्या सूचना देण्यात आल्या, त्यामध्ये मौजे फेट्री येथील स्थानिक नाल्यास दरवर्षी पूर येतो. पावसाळयामध्ये नाल्याच्या पूराचे पाणी गावामध्ये शिरते. त्या अनुषंगाने सदर नाला सरळीकरणाचे कामास प्रशासकीय मान्यता देणे बाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

या शासन निर्णयाद्वारे मौजे फेट्री ता.दिग्रस जि.यवतमाळ येथील स्थानिक नाल्याजवळच्या भागाचे पूरापासून संरक्षण करण्याकरीता नाला सरळीकरण या कामाप्रित्यर्थ खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे खर्च रु. ७४,२८६/- (अक्षरी रु. चौऱ्याहत्तर हजार दोनशे शहाऐंशी फक्त) इतक्या खर्चाच्या प्रस्तावास तक्त्याखालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचा तपशील | प्र.मा. रक्कम रु. |
|---|---|---|
| १ | मौजे फेट्री ता. दिग्रस येथील पुरसंरक्षक उपाय योजने अंतर्गत नाला सरळीकरणाचे काम | ७१,४०८/- |
| २ | अनुषंगिक खर्च | २,८७८/- |
| | **एकूण खर्च** | **७४,२८६/-** |

अ) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू १०९२/(१७०)/सिंव्य(कामे) दि. ७.८.१९९२ नुसार कार्यवाही करावी.

ब) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने व दरसूची बाह्य बाबी सक्षम स्तरावर मंजूरी घेवूनच अंदाजपत्रकांना तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

क) बांधकामासाठी भूसंपादन करु नये.

ड) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर मौजे फेट्री ग्राम पंचायतीने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरुस्ती करावयाची आहे. काम सुरु करण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र मौजे फेट्री ग्राम पंचायती कडून प्राप्त करुन घ्यावे.

इ) नाला सरळीकरणाचे काम जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडून करणे अपेक्षित आहे.

ई) सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून, कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरित उपलब्ध करुन देण्यात यावे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च ४७११ पूरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, (०१) पूरनियंत्रण प्रकल्प, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील

गुंतवणूका, (०१)(०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ भागभांडवली अंशदान (४७११ २८८३) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (महसूल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. २२ /सन २०१४ वर नोंदविण्यात आलेली आहे.

४. प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२११६४५१८७८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yashavantrao Kashinath Bhadane

Digitally signed by Yashavantrao Kashinath Bhadane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashavantrao Kashinath Bhadane
Date: 2014.07.21 16:44:37 +05'30'

**( य. का. भदाणे )**

शासनाचे अवर सचिव

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,

३) मा.उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय,

४) मा.सभापती/उपसभापती, विधान परिषद, विधानभवन, मुंबई

५) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई

६) मा.विरोधी पक्षनेते, विधान परिषद,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई

७) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

८) मा.मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,

९) मा.मंत्री, जलसंपदा (मकृखोविम) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,

१०) मा.राज्यमंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,

११) प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई

१२) प्रधान सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई

१४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१५) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर,

१६) मुख्य अभियंता(पा) व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१७) मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग, अमरावती,

१८)आंतरवित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई

१९) सर्व सह सचिव/ उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

२०) उपसचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

२१) अधीक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ,

२२) जिल्हाधिकारी, यवतमाळ,

२३) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई

२४) ग्रंथालय,विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई

२५) सिंव्य(महसूल), कार्यासन संग्रहार्थ.